पावसाळा कालावधीत कोळकेवाडी धरणातून येणाऱ्या अवजलाच्या पाण्यामुळे चिपळूण शहरास पुराची दाहकता वाढते यावर पावसाळा कालावधीत धरणातील पाणी सोडण्याचे नियोजन करण्यासंदर्भातील उपाययोजना सूचविण्याकरीता अभ्यास गटाची स्थापन करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
जलसंपदा विभाग
**शासन निर्णय क्र:- बैठक- २०२१/प्र.क्र.४७५/२०२१/सिं.व्य.(म).**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक:- २० मे, २०२२.

**प्रस्तावना :-**

चिपळूण व महाड शहरातील पूर परिस्थिती संबंधात उपाययोजनाबाबत मा.उपमुख्यमंत्री महोदयांच्या अध्यक्षतेखाली दि.१५/१२/२०२१ रोजी बैठक पार पडली. सदर बैठकीमध्ये पावसाळा कालावधीत कोळकेवाडी धरणातून येणाऱ्या अवजलाच्या पाण्यामुळे चिपळूण शहरास पुराची दाहकता वाढते असे चिपळूण बचाव समिती सदस्य यांनी नमूद केले. याबाबत वस्तुस्थितीचा अभ्यास करुन उपाययोजना सूचविण्याकरीता निवृत्त मुख्य अभियंता श्री.डी.एन.मोडक यांच्या अध्यक्षतेखाली अभ्यास गटाची स्थापना करण्याचे निर्देश मा.उपमुख्यमंत्री महोदयांनी दिले आहेत. या निर्देशानुसार अभ्यास गट स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

उपरोक्त बैठकीच्या इतिवृत्तानुसार, पावसाळा कालावधीत कोळकेवाडी धरणातून येणाऱ्या अवजलाच्या पाण्यामुळे पुराची दाहकता वाढते यावर पावसाळा कालावधीत कोळकेवाडी धरणातील पाणी सोडण्याचे नियोजन करण्यासंदर्भातील उपाययोजना सूचविण्याकरीता पुढीलप्रमाणे अभ्यास गट स्थापन करणेस शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | सदस्यांचे नाव | पद |
|---|---|---|
| १ | श्री.दिपक मोडक, (सेवा निवृत्त), मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग | अध्यक्ष |
| २ | श्री.संजय चोपडे, मुख्य अभियंता, महाजेनको, पोफळी | सदस्य |
| ३ | श्रीमती.वैशाली ग. नारकर, अधीक्षक अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे मंडळ, रत्नागिरी | सदस्य |
| ४ | श्री.प्रसाद शिंगटे, मुख्याधिकारी, चिपळूण नगरपरिषद, चिपळूण | सदस्य |
| ५ | डॉ. शरद जोशी, विभाग प्रमुख, स्थापत्य अभियांत्रिकी विभाग, KLE Institute of Technology, हुंबळी | सदस्य |
| ६ | डॉ. प्रकाश पाटणकर, चिपळूण रहीवाशी व सामाजिक कार्यकर्ते | सदस्य |
| ७ | श्री.संजीव अणेराव, ॲग्रो टुरिझम, चिपळूण रहीवाशी व सामाजिक कार्यकर्ते | सदस्य |
| ८ | श्री.नितिश पोतदार, कार्यकारी अभियंता, कोयना सिंचन विभाग, कोयनानगर | सदस्य सचिव |
| ९ | श्री.ज.म.पाटील, कार्यकारी अभियंता, रत्नागिरी पाटबंधारे विभाग, रत्नागिरी | समन्वय सदस्य सचिव |

**अभ्यास गटाची कार्यकक्षा:-**

१) जुलै २०२१ च्या महापूरामध्ये कोयना अवजल विसर्गामुळे चिपळूण शहर व परिसरावर झालेला परिणाम तसेच त्या कालावधीत कोळकेवाडी धरणातून सोडण्यात आलेल्या विसर्गाच्या परिमाणाचे दृढीकरण व विसर्ग सोडण्याची कारणमिमांसा.

२) कोळकेवाडी अवजलाचा महत्तम विसर्ग, महत्तम भरती पातळीचे वेळी त्याचा चिपळूण शहरामध्ये वाशिष्ठी नदीमधील जलपातळी मध्ये होणाऱ्या वाढीचा अभ्यास व त्याचा चिपळूण शहर परिसरात होणारा परिणाम.

३) भविष्यात जलसंपदा विभाग, उर्जा विभाग व महसूल विभाग यांचे समन्वयाने कोळकेवाडी धरण पायथा विद्युतगृहातून विद्युतनिर्मिती नंतर वाशिष्ठी नदीमध्ये सोडण्यात येणाऱ्या पाण्यासंदर्भात अथवा कोळकेवाडी पूर विसर्गाच्या पाण्यासंदर्भात सुधारीत Standard Operating Procedure (SOP) निश्चित करणे.

४) कोळकेवाडी ते वाशिष्ठी नदीच्या संगमापर्यंतच्या नदीपात्रामध्ये तत्कालीन विद्युतगृहाच्या बोगद्याच्या खोदकामावेळी नदीपात्रालगत रचलेल्या खोदकाम साहित्यामुळे अडथळा निर्माण झाला आहे किंवा कसे ? तसेच या नदीच्या वहनक्षमतेबाबत अभ्यास करुन त्यावेळी प्रकल्प अहवालामध्ये अवजल सोडणेची तरतूद केली आहे किंवा कसे याबाबत अभिप्राय/ शिफारस करणे.

**अभ्यास गटाचा कालावधी:-**

सदर अभ्यास गटाचा कार्यकाळ हा आदेश निर्गमित झाल्यापासून दोन महिने राहील.

**समिती सदस्यांना मानधन :-**

१) समिती अध्यक्ष व सदस्यांना शासन निर्णय क्र.मजनिप्रा-२०१६/ ४८५/ (प्र.क्र.१४५/२०१६)/ जसं (आस्था), दि.१८/०४/२०१७ या प्रमाणे मानधन अनुज्ञेय राहील.

२) सेवेत कार्यरत शासकीय अधिकारी, महाजनको चे अधिकारी किंवा समकक्ष यांना समितीच्या कामकाजात सहभागी होण्यासाठी कोणतेही मानधन अनुज्ञेय नसेल.

सदरहू अभ्यास गट सदस्यांचे मानधन व प्रवास खर्च यापोटी येणारा खर्च हा पुढील लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध अनुदानातून व ठोक तरतुदीमधून भागविण्यात यावा.

मागणी क्र.आय -५<br>
मुख्य लेखाशिर्ष-४७११ पूरनियंत्रण प्रकल्पांवरील भांडवली खर्च<br>
००,०१ पूरनियंत्रण<br>
१९०, सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमातील गुंतवणुका<br>
(०१) विविध पाटबंधारे विकास महामंडळाना भाग भांडवली अंशदान<br>
(०१)(०४) कोकण पाटबंधारे विकास महामंडळाला भागभांडवली अंशदान (कार्यक्रम) (४७११ २८४७) ५४, गुंतवणूका.

शासकीय सेवेत कार्यरत असलेल्या अधिकाऱ्यांना दैनिक भत्ता व प्रवास खर्च संबंधित विभागांनी त्यांच्या उपलब्ध निधीतून व अनुज्ञेयतेप्रमाणे प्रदान करण्यात यावा.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला आहे. त्याचा संगणक संकेतांक २०२२०५२०१४३२५२७३२७ असा असून डिजीटल स्वाक्षरीने सांक्षाकित करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

VAISHALI PRASAD VARTAK

Digitally signed by VAISHALI PRASAD VARTAK
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=WATER RESOURCES DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9fb1c9a9426027ca2f11a7a30ff949ff5ed465957d4c7dc4c66b3dc1bf4c7f00, serialNumber=33e33f6ca13b831b10b9c6734a1a7a0786a401567bf3ab6fa1cdb7f5727206f2, cn=VAISHALI PRASAD VARTAK
Date: 2022.05.20 14:35:21 +05'30'

**( वैशाली वर्तक )**
**कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा.राज्यपालांचे सचिव,
२. मा.मुख्यमंत्री यांचे सचिव,
३. मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
४. मा.मंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव,
५. मा.राज्यमंत्री, जलसंपदा यांचे खाजगी सचिव,
६. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय,मुंबई,
७. महालेखापाल-१ व २ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा) महाराष्ट्र, मुंबई व नागपूर,
८. अपर मुख्य सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
९. सचिव (लाक्षेवि) जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०. कार्यकारी संचालक, कोकण पाटबंधारे विकास महामंडळ, ठाणे,
११. मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग, कोकण प्रदेश, मुंबई.
१२. सर्व समिती सदस्य यांचे मार्फत.
१३. सिं.व्य. (म.) संग्रहार्थ.